**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. सिंचन २०१५/प्र.क्र.२४ /२०१५/जसं (धोरण)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ जानेवारी, २०१७.

वाचावे : १) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शा.नि. क्र. सिंचन २०१५/प्र.क्र.२४ /२०१५/जसं (धोरण), दिनांक ०९ जून, २०१६.
२) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शा.नि. क्र. संकीर्ण २०१५/(४२५/२०१५)/ मध्यम प्रकल्प, दि. १६ नोव्हेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१७ पर्यंत पाणी वापराच्या कार्यक्षमतेत २० टक्क्यांनी वाढ करण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे व त्या अनुषंगाने उपाययोजना करण्याचे राज्य शासनास आव्हान केलेले आहे. कृषी क्षेत्रातील पाणी वापर हा लक्षणीय असल्याने कृषी क्षेत्रातील पाणी वापराची कार्यक्षमता वाढविण्यास प्राधान्य देणे गरजेचे आहे. तसेच महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या (MWRRA) दि. १२.६.२०१५ रोजीच्या अधिसूचनेनुसार सन २०१९ पासून बारमाही पिकांना सुक्ष्म सिंचनाद्वारे पाणी देणे अनिवार्य केलेले आहे.

महाराष्ट्र जल व सिंचन आयोगाने अंदाजित केल्यानुसार राज्याचे लागवडीलायक क्षेत्र सुमारे २२५ लक्ष हेक्टर आहे. राज्यातील भूपृष्ठावरील व भूजलाची उपलब्धता विचारात घेता भूपृष्ठावरील पाण्यातून सुमारे ८५ लक्ष हेक्टर व भूजलाव्दारे ४१ लक्ष हेक्टर असे एकूण १२६ लक्ष हेक्टर म्हणजेच लागवडीलायक क्षेत्राच्या ५६ टक्के इतकेच क्षेत्र अंतिमत: सिंचनाखाली येऊ शकते. वाढत्या नागरीकरणामुळे व औद्योगिकरणामुळे बिगर सिंचन पाणी वापरात वाढ होत आहे. त्यामुळे सिंचनासाठी उपलब्ध होणाऱ्या पाण्यात घट झाली आहे व ही घट भविष्यात वाढतच जाणार आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन सिंचनासाठी उपलब्ध होणाऱ्या पाण्याचा इष्टतम वापर करुन जास्तीत जास्त क्षेत्र सिंचनाखाली आणणे गरजेचे आहे. यासाठी पारंपारीक वितरण प्रणाली व सिंचन पध्दतीत सुधारणा करण्याची गरज निर्माण झाली आहे.

पारंपारिक वितरण प्रणालीत कालवे, वितरिका, लघुकालवे व शेतचाऱ्यांची आखणी कालव्याच्या प्रवाहासाठी जमीनीची आवश्यक पातळी विचारात घेऊनच करावी लागते. यामध्ये काही विशिष्ठ शेतकऱ्यांची जास्त जमीन जाते.

कालवे बांधावरुन घ्यावेत, सर्वाची जमीन समप्रमाणात घ्यावी, अशा सूचना करुन शेतकरी वितरण प्रणालीस विरोध करतात. शेतकऱ्यांचा विशेषत: अल्प भूधारक शेतकऱ्यांचा विचार करता त्यांची भूमिका योग्यही असते. मात्र पारंपारिक कालवा वितरण प्रणाली संकल्पित करताना तांत्रिक अपरिहार्यतेमुळे या सूचना मान्य करता येत नाहीत. त्यामुळे शेतकऱ्यांचा विरोध कायम राहतो व वितरण व्यवस्थेची कामे वर्षानुवर्षे रेंगाळतात.

कालव्याच्या मुखाकडील शेतकरी थेट कालव्यावर पंप बसवून पाणी घेतात. त्यामुळे मुखाकडील भागात पाण्याचा जादा पाणी वापर होतो. मात्र पुच्छ भागातील शेतकरी सिंचनाच्या लाभापासून वंचित राहतात. काही प्रकरणी उपरोक्त कारणांमुळे वितरण व्यवस्थेअभावी धरणात पाणीसाठा होऊनही त्याचा वापर होत नाही व आर्थिक गुंतवणूक फलद्रुप होत नाही. अशा प्रकरणी सिंचनाचे लाभ लवकर मिळण्यासाठी नलिका वितरण हा एक पर्याय होऊ शकतो.

गेल्या नजिकच्या कालावधीत जमिनीच्या किंमती मोठ्या प्रमाणावर वाढल्या आहेत.

भू-संपादनासह कालव्याचे मातीकाम, बांधकामे विचारात घेऊन त्यावरील एकूण भांडवली गुंतवणूकीचा व आवर्ती खर्चाचा एकत्रित विचार केल्यास बऱ्याच प्रकरणी नलिका वितरण आर्थिकदृष्ट्या किफायतशीर ठरु शकते. कोकणासारख्या जास्त चढउतार असणाऱ्या लाभक्षेत्रातील वितरण प्रणालीवरील बांधकामांची संख्या जास्त राहते. अशा परिस्थितीत पाईप वितरण प्रणालीचा अवलंब केल्यास बांधकामाची संख्या कमी होते व खर्चात बचत होते. त्याचप्रमाणे काळया मातीतील कालव्यावरील बांधकामाचा खर्च खोल पायामुळे जास्त येतो. अशा प्रकरणी सुध्दा नलिका वितरण प्रणाली किफायतशीर ठरु शकते.

त्याचप्रमाणे जमिनीत आवश्यकतेपेक्षा जास्त ओलावा निर्माण झाल्यास संत्रा पिकाचे व फळ बागांच्या उत्पादनात घट होते. याउलट नलिका वितरण प्रणालीद्वारे आवश्यकतेनुसार नियंत्रित पाणी पुरवठा करता येत असल्याने विशेष करुन संत्रा व इतर फळबागा असणाऱ्या प्रकल्प लाभक्षेत्रात तसेच पश्चिम विदर्भातील खारपाण पट्टयात पारंपारिक वितरण प्रणालीस शेतकऱ्यांचा विरोध आहे. नलिका वितरण प्रणालीसाठी शेतकरी आग्रही आहेत.

नलिका प्रणालीमुळे भूसंपादनाची गरज राहत नाही. तसेच मशागतीस कोणताही अडथळा येत नाही. नलिका वितरणाद्वारे समन्यायी पाण्याचे वाटप करणेही सुलभ होते. नलिका वितरण प्रणालीचा देखभाल-दुरुस्ती व परिचलनाचा खर्चही तुलनेने कमी राहतो. डोंगर उतारावरील, खोल खोदाईतील व काळ्या मातीतील कालव्यावर तुलनेने देखभाल-दुरुस्तीचा खर्च जास्त राहतो.

वरीलप्रमाणे विविध स्थानिक परिस्थितीमध्ये नलिका वितरण हे पारंपारिक कालवा वितरणापेक्षा सरस ठरु शकते. मात्र शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. मजनिप्रा-२०११/(२४/२०११)/जसं (आस्था.), दि. १० जून २०१३ मधील तरतुदीनुसार केवळ प्रशासकीय मान्यता प्राप्त प्रकल्प अहवालात पारंपारिक वितरण प्रणालीची तरतूद असल्याने सुधारित प्रशासकीय मान्यता घेतल्याशिवाय नलिका वितरण प्रणालीचा अवलंब करता येत नाही. त्यामुळे नलिका वितरण प्रणाली बाबत स्वतंत्र धोरण संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०९ जुन २०१६ च्या शासन निर्णयानुसार जाहिर करण्यात आले. सदर नलिकेव्दारे सिंचन वितरण धोरणाच्या अनुषंगाने राज्यासाठी नलिकाव्दारे सिंचन वितरण प्रणालीच्या जलदपणे व कार्यक्षम अंमलबजावणीसाठी सर्व पाटबंधारे विकास महामंडळाचे कार्यकारी संचालक, मुख्य अभियंता, अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांची दिनांक १३ जुलै २०१६ रोजी वाल्मी, औरंगाबाद येथे कार्यशाळा घेण्यात आली. सदर कार्यशाळेत केंद्र शासनाच्या PMKSY योजने अंतर्गतचे सिंचन प्रकल्प तसेच भूसंपादनाच्या अडचणीमुळे काही ठिकाणी कालव्याची कामे पूर्ण न झाल्यामुळे संपुर्ण वितरण प्रणालीमध्ये सलगता नाही, अशा प्रकल्पांमध्ये नलिका वितरण प्रणाली जलदगतीने घेण्यासाठी दिनांक ०९.०६.२०१६ च्या शासन निर्णयामध्ये काही सुधारणा करणे आवश्यक असल्याबाबतच्या शिफारशी करण्यात आल्या. पारंपारिक वितरण प्रणाली ऐवजी नलिका वितरण प्रणाली अवलंबताना कालपव्यय टाळून अंमलबजावणी जलदगतीने होण्यासाठी दिनांक १३.०७.२०१६ रोजीच्या कार्यशाळेतील शिफारशींनुसार दिनांक ०९.०६.२०१६ च्या शासन निर्णयात बदल करणे आवश्यक आहे. तसेच दरम्यानच्या काळात संदर्भ २ मधील शासन निर्णय निर्गमित झाला आहे.

या पार्श्वभूमिवर संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०९.०६.२०१६ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रशासकीय मान्यता प्राप्त प्रकल्प अहवालात पारंपारिक कालवा वितरण व्यवस्थेची तरतूद असताना केवळ योजनेच्या काही भागात नलिका वितरण प्रणाली प्रस्तावित करताना संपूर्ण प्रकल्प अहवालास सुधारित प्रशासकीय मान्यता घेण्याची गरज राहणार नाही. मात्र नलिका वितरणाचा प्रस्ताव शासन निर्गमित करेल अशा मार्गदर्शक सूचनांशी सुसंगत असावा.

२. नलिका वितरण प्रणाली वापरण्यासाठी शासन स्तरावरुन कोणत्याही स्वतंत्र मान्यतेची आवश्यकता राहणार नाही. महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावली परिच्छेद १३४ व १३५ व परिशिष्ठ-४२, (महाराष्ट्र शासन, सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय विअसु २०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि.१६ डिसेंबर २०१५ नुसार सुधारित केल्याप्रमाणे) नुसार तांत्रिक मान्यतेस मुख्य अभियंता यांना पूर्ण अधिकार, अधीक्षक अभियंता यांना रु. २.५ कोटी पर्यन्त व कार्यकारी अभियंता यांना १.० कोटी पर्यंत अधिकार आहेत. याच मर्यादेत संकल्पचित्र मंजूरीचे अधिकार सबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांना आहेत. मुख्य अभियंता यांना संकल्पचित्र मान्यतेबाबत ही पूर्ण अधिकार आहेत. सदर प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन प्रकल्पाच्या / प्रकल्प घटकाच्या पाईप वितरण प्रणालीच्या अंदाजपत्रकास सक्षम स्तरावरुन तांत्रिक मान्यता देण्यात यावी. तत्पुर्वी नलिका वितरण प्रणालीचा प्रस्ताव शासन निर्गमित करेल अशा मार्गदर्शक सूचनांशी सुसंगत आहे याची खात्री करण्यात यावी. तसेच तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिकाऱ्याने नलिका वितरण आराखडयास व संकल्पचित्रास मान्यता द्यावी. प्रस्तावाची आर्थिक व्यवहार्यता तपासून संबधित कार्यकारी संचालकांनी प्रस्तावास मान्यता द्यावी.

३. नलिका वितरण प्रणालीचा प्रस्ताव हा आवश्यक सर्वेक्षणावर व सविस्तर संकल्पचित्रावर आधारित असावा. लाभक्षेत्रामध्ये महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम, २००५ (MMISF ACT, २००५) व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ (MWRRA ACT, २००५) मधील तरतुदीनुसार सर्व लाभार्थींमध्ये हक्कदारीनुसार व समन्यायी पध्दतीने पाणी वाटप करणे शक्य होईल, या दृष्टीने नलिका वितरण प्रणालीचे संकल्पन व आराखडा तयार करावा. नलिका वितरण प्रणाली आराखडा तयार करताना लाभक्षेत्रातील भूपृष्ठजल, भूजल व कालव्याच्या पाण्याचा संयुक्त वापर शेतकऱ्यांना त्यांच्या गरजेनुसार प्रवाही सिंचनाबरोबरच सुक्ष्मसिंचन पध्दतीने करणे शक्य होईल, ही बाब विचारात घ्यावी.

४. नलिका वितरण प्रणालीमुळे होणाऱ्या पाण्याच्या बचतीचा उपयोग लाभक्षेत्रातील लागवडीयोग्य क्षेत्र व नियोजित सिंचनक्षेत्रातील तफावत दूर करण्यासाठी व बिगर सिंचन आरक्षणामुळे झालेल्या सिंचन कपातीची पूनर्स्थापना करण्यासाठी करावा.

५. नलिका वितरण प्रणालीमुळे संदर्भ २ मधील शासन निर्णयातील परिच्छेद २ नुसार व्याप्ती बदल होत असल्यास या शासन निर्णयातील नमुद परिच्छेद ४ नुसार सुधारित प्रशासकीय मान्यता घेण्याबाबतची कार्यवाही करावी.

६. नलिका वितरण प्रणाली प्रस्तावित करण्यापुर्वी नियोजित लाभक्षेत्रामध्ये MMISF ACT, २००५ नुसार निर्माण करावयाच्या पाणी वापर संस्थांबाबतचे नियोजन व आराखडा तयार करावा तसेच नियोजनामध्ये लाभधारकांचा सहभाग घेण्यात यावा. नलिका वितरण प्रणालीचे काम सुरु होईपर्यंत महाराष्ट्र सिंचन प्रणालीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ कलम १ (३) व २ ची अधिसूचना काढण्यात यावी. नलिका वितरण प्रणालीचे काम संपेपर्यंत उक्त अधिनियमातील कलम ५, ६, ७ नुसार अधिसूचना ३ काढण्यात यावी. काम पूर्ण

झाल्यानंतर व पहिली ३ वर्षे परिचलन झाल्यानंतर वितरण प्रणाली व्यवस्थापनासाठी पाणीवापर संस्थेस हस्तांतरीत करावी.

७. नलिका जोडणी शक्यतो पिके निघून गेल्यानंतर करण्याचे नियोजन करावे, मात्र आवश्यकतेनुसार पिक नुकसान भरपाईची तरतूद करण्यात यावी.

८. नलिका वितरण प्रणाली धोरण म्हणून स्वीकारताना विभागाकडे याबाबतचे संकल्पन करणारी स्वतंत्र यंत्रणा उपलब्ध असणे गरजेचे आहे. उपलब्ध आस्थापनेतून अशी यंत्रणा जलसंपदा विभागाने निर्माण करावी व ती दोन वर्षात सक्षम करावी.

उपरोक्त स्वतंत्र यंत्रणा सक्षमतेने कार्यरत होईपर्यंत सविस्तर संकल्पनाची पर्यायी व्यवस्था विभागांतर्गत किंवा खाजगी सल्लागारामार्फत करण्यात यावी तसेच संकल्पचित्रासह योजना कार्यान्वयीत करण्याबाबतच्या निविदा काढण्याचा पर्याय निवडावा, मात्र संबधित मुख्य अभियंत्याने सदर संकल्पचित्रास मान्यता द्यावी.

९. निविदा मधील देखभाल दुरुस्ती कालावधी ५ वर्षे ठेवण्यात यावा. त्यापैकी शेवटच्या २ वर्षात पाणी वापर संस्थेसोबत ठेकेदाराने संयुक्त कार्यवाही करावी. एका पाणी वापर संस्थेच्या संपूर्ण कार्यक्षेत्रातील नलिका वितरणाचे काम पूर्ण झाल्यानंतर झालेल्या त्या पाणीवापर संस्थेच्या कार्यक्षेत्रातील कामाच्या पूर्ण किंमतीच्या ८०% रक्कम अदा करावी व उर्वरित रकमेपैकी १०% रक्कम यशस्वी चाचण्यानंतर व १०% रक्कम Defect Liability Period साठी रोखून ठेवण्यात यावी. Defect Liability Period ५ वर्षाचा असावा. Defect Liability साठी राखून ठेवलेली १०% रक्कम Defect आढळल्यास ते ज्या त्या वेळी कंत्राटदाराकडून दूर करुन घेऊन दरवर्षी २% प्रमाणे अदा करावी, असे सर्वसाधारणपणे धोरण राहील. तथापि अनुभवाअंती प्रकल्पसापेक्ष विशेषता विचारात घेऊन बदल करण्याचे अधिकार मुख्य अभियंता यांना राहतील.

१०. नलिका वितरण प्रणाली बाबतचे सविस्तर निकष / मार्गदर्शक सूचना जलसंपदा विभागाने तांत्रिक परिपत्रकाव्दारे निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय संदर्भ - २ मधील शासन निर्णय अधिक्रमित करुन तसेच नियोजन विभागाने अनौपचारिक सं.क्र.१६३ /१४३३ /२०१६, दि.०१.०९.२०१६ व वित्त विभागाने अनौपचारिक सं.क्र. २६७/२०१६, दि. २३.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०११३१७०१३३५४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajnish
Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2017.01.13 17:15:47 +05'30'

( र.रा.शुक्ला )
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. सर्व विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य
६. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (प्रस), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण,मुंबई.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१५. महासंचालक, मेरी, नाशिक
१६. महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद
१७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१८. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१९. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
२०. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२१. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२२. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
२३. मुख्य अभियंता, यांत्रिकी, जलसंपदा विभाग, नाशिक
२४. मुख्य अभियंता, जलविद्यूत प्रकल्प (विद्यूत), मुंबई
२५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद /नागपूर /अमरावती / पुणे / कोकण विभाग / मुंबई / उत्तर महाराष्ट्र विभाग, नाशिक / तापी पाटबंधारे विभाग, जळगांव
२६. मुख्य अभियंता, लाभक्षेत्र विकास, औरंगाबाद
२७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जल विकास केंद्र, औरंगाबाद
२८. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर
२९. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, अमरावती
३०. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे
३१. मुख्य अभियंता (द व प्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३२. मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३३. मुख्य अभियंता (कृपातंल) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३४. मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५. मुख्य अभियंता, संकलन, प्रशिक्षण, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक.
३६. मुख्य अभियंता (स्थापत्य), जलविद्युत, पुणे.
३७. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३८. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३९. अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे

४०. अधीक्षक अभियंता, (माती धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सीडीओ), नाशिक.
४१. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
४२. अधीक्षक अभियंता, (व्दारे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४३. अधीक्षक अभियंता, (दगडी धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४४. अधीक्षक अभियंता, (विदयुत गृहे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
४५. कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे.
४६. कोयना (वि.व.यां) संकल्पचित्र मंडळ, पुणे
४७. महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
४८. अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, (DSO) नाशिक.
४९. जलनियोजन विभाग, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना (सिडिओ), नाशिक.
५०. जलगती संशोधन विभाग क्र.१, नाशिक
५१. भुकंप उपकरणे कक्ष व भुकंप आधार सामुग्री पृथ:करण कक्ष, नाशिक.
५२. संरचनात्मक संशोधन व पदार्थ विज्ञान विभाग, नाशिक.
५३. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, पुणे.
५४. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर.
५५. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद.
५६. गाळ सर्वेक्षण विभाग, नाशिक.
५७. सुदूर संवेदन व भूमाहिती शास्त्र विभाग, नाशिक.
५८. सामुग्री चाचणी विभाग व मृदू चाचणी विभाग, मेरी, नाशिक.
५९. भुकंप आधार सामुग्री पृथ:करण विभाग, मेरी, नाशिक.
६०. उपकरणे संशोधन विभाग, मेरी, नाशिक
६१. अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री (पृथ:करण) मंडळ,नाशिक
६२. सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६३. जलसंपदा (धोरण) कार्यासन (संग्रहार्थ).